भुमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपुर, यांच्या आस्थापनेवरील एकुण १३ अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१८ पासुन दिनांक २८.२.२०१९ पर्यंत मुदत वाढ देण्याबाबत.........

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :आरपीए२०१-८/प्र.क्र.१३६/र-१**
मंत्रालय, मुंबई -०३२ ४००
दिनांक : ४ आक्टोबर, २०१८

**संदर्भ - :**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग , आरपीए-१४१५/प्र.क्र.४५/र-१ दि.२०/१२/२०१६
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. ७.८.२०१८

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने "भुमी संपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना करतांना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" हा नविन अधिनियम भुसंपादन व पुनर्वसन यासाठी एकत्रितपणे पारित केला. अधिनियमातील कलम ५१ नुसार शासन निर्णय, महसुल व वन विभाग, दि. २०.१२.२०१६ अन्वये भुमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली असुन एकुन १३ पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ७.९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ठ असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजुर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. १.१०.२०१८ ते २८.२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन भुमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपुर यांच्या आस्थापनेवरील एकुन १३ अस्थायी पदांना वरील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भुमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपुर यांच्या आस्थापनेवरील एकुन १३ अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१८ ते २८.२.२०१९ या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ७.९.२०१८ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च मागणी क्र. सी-५, लेखाशिर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२ इतर पुनर्वसन योजना, (०३) प्रकल्प बाधित व्यक्तीची पुनर्वसाहत, (०३) (०९) भुसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण ( २२३५ सी०६३) या लेखाशिर्षाखालील सन २०१८-२०१९ च्या मंजुर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. ७.९.२०१८ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढुन देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१८१००९१६४१०९७७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2018.10.09 16:46:56 +05'30'

**(राहुल कुलकर्णी)**
उप सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :**

१. विभागीय आयुक्त,नागपुर
२. निबंधक( तहसिलदार), भुमीसंपादन पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण, नागपुर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरिक्षा, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपुर
५. मा. अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक
६. वित्त विभाग ( कार्यासन व्यय-१०/अर्थ-६), मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
८. र-१ कार्यासन निवडनस्ती.